छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी ) पुणे यांच्या आस्थापनेवरील वरिष्ठ प्रकल्प संचालक (शिक्षण) पदावर प्रतिनियुक्तीने पदस्थापना देणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**

**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**

**शासन आदेश क्रमांक : ईएसटी-३९२१ /प्र.क्र.१०३ /प्रशा-२**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक:- २७ सप्टेंबर, २०२१

वाचा : नियोजन विभाग शा.नि.क्र. सारथी-२०२१/प्र.क्र.७८/का-१४२५,दिनांक ०४.०५.२०२१

**शासन आदेश :**

नियोजन विभागाच्या दिनांक ०४.०५.२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी ) पुणे या कंपनीच्या आस्थापनेवर नियमित स्वरुपाची पदे व बाह्ययंत्रणेद्वारे नियुक्त करावयाची ४१ पदे निर्माण करण्यात आली आहेत. त्यामध्ये वरिष्ठ प्रकल्प संचालक (शिक्षण) चे १ पद निर्माण करण्यात आले आहे. सदरचे पद शालेय शिक्षण विभागाच्या अधिपत्याखालील अधिकाऱ्याची प्रतिनियुक्तीने भरण्यात येणार आहे.

२. श्री. विलास पाटील, प्राचार्य, राज्य शैक्षणिक संशोधन व परीक्षा परिषद, पुणे यांची वरिष्ठ प्रकल्प संचालक (शिक्षण), छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी ) पुणे पदावर प्रथमत: दोन वर्षासाठी प्रतिनियुक्तीने पदस्थापना करण्यात येत आहे.

३. सदर अधिकाऱ्यांनी त्यांच्या नवीन पदाचा पदभार त्वरित स्विकारावा तसेच त्यांनी अनधिकृत रजेवर जाऊ नये. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी या आदेशाप्रमाणे प्रतिनियुक्ती झालेले अधिकारी विहित कालावधीत दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू होतील, याची खातरजमा करावी व याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.

४. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२१०९२७१७१०१२८५२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DEEPAK VIJAY SHELAR

Digitally signed by DEEPAK VIJAY SHELAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=a8b4d56939f92ca00d0f1036f37e5c0743e0f0aea72b2f23cc46d5945ab37d69, pseudonym=0BFE14F7A1A9C39851527D3E05D62CA529C327D7, serialNumber=8E3FEAC5ACB11AE3D9464A8A336D7067314E8F58B632FCBB7B5B4CF900C4649B, cn=DEEPAK VIJAY SHELAR
Date: 2021.09.27 17:12:14 +05'30'

**( दीपक शेलार )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
२. व्यवस्थापकीय संचालक, छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी), पुणे.
३. सर्व शिक्षण संचालक.
४. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
५. संबंधित अधिकारी ( शिक्षण आयुक्तालयामार्फत )
६. मा.मंत्री, शालेय शिक्षण यांचे खाजगी सचिव
७. मुख्य सचिवांचे स्वीय सहायक
८. अपर मुख्य सचिव (नियोजन विभाग), यांचे स्वीय सहायक.